श्री. ज्ञानेश्वर हरिभाऊ खरात यांना “अधीक्षक, जिल्हा कारागृह, वर्ग २/ उप अधीक्षक, मध्यवर्ती कारागृह, गट ब (राजपत्रित)” या संवर्गाच्या पदावरील शासन सेवेतून निलंबित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन आदेश क्र.जेएलई-०३२५/प्र.क्र.६०/तुरुंग-१**

दुसरा मजला, मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-३२.
दिनांक : १२ मार्च २०२५

**संदर्भ** :
१) शासन निर्णय, गृह विभाग, क्र.जेएलई-०३२२/प्र.क्र.८१/तुरुंग-१, दिनांक २४/०६/२०२२.
२) शासन आदेश, गृह विभाग, क्र.जेएलई-०४२४/प्र.क्र.८०/तुरुंग-१, दिनांक ११/०२/२०२५.
३) श्री. यशवंत सानप, स्वीय सहायक, विशेष पोलीस महानिरीक्षक (कारागृह), मध्य विभाग, छत्रपती संभाजीनगर, यांचे पत्र, दिनांक २५/०२/२०२५.
४) श्री. ज्ञानेश्वर हरिभाऊ खरात, अधीक्षक, जिल्हा कारागृह, नांदेड, यांचे पत्र, दिनांक २५/०२/२०२५.
५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/ कार्यासन-१२, दिनांक १७/१२/२०१६

**शासन आदेश :-**

उपरोक्त नमूद संदर्भ क्र.१ येथील शासन आदेशाद्वारे श्री. ज्ञानेश्वर हरिभाऊ खरात यांची “अधीक्षक, जिल्हा कारागृह, वर्ग २/उप अधीक्षक, मध्यवर्ती कारागृह, गट ब (राजपत्रित)” या संवर्गात “अधीक्षक, मोर्शी खुले कारागृह” येथे पदोन्नतीने पदस्थापना करण्यात आली होती. तथापि, संदर्भ क्र.४ येथील पत्राच्या आधारे ते “अधीक्षक, जिल्हा कारागृह, वर्ग २, नांदेड” या पदावर कार्यरत असल्याचे दिसून आले.

२. शासन आदेश, गृह विभाग, दिनांक ११/०२/२०२५, द्वारे श्री. संपत हामू आढे यांची “अधीक्षक, जिल्हा कारागृह, वर्ग २/उप अधीक्षक, मध्यवर्ती कारागृह, गट ब (राजपत्रित)” या संवर्गातील “अधीक्षक, जिल्हा कारागृह, वर्ग २, नांदेड” या पदावर पदोन्नतीने पदस्थापना करण्यात आली आहे. तथापि, श्री. आढे हे सदर पदावर रुजू होण्याकरिता गेले असता, श्री.खरात यांनी, त्यांना ”जिल्हा कारागृह, वर्ग २, नांदेड” या आस्थापनेवरील “अधीक्षक” या

पदावर रुजू करण्याऐवजी "उप अधीक्षक" या पदावर दिनांक १९/०२/२०२५ रोजी रुजू करुन घेतले व ते स्वत: "अधीक्षक, जिल्हा कारागृह, वर्ग २, नांदेड" या पदावर कार्यरत राहिले. त्यानंतर त्यांनी, श्री.आढे यांना संदर्भ क्र.३ येथील पत्राद्वारे बेकायदेशीरपणे लातूर येथील प्रतिनियुक्तीच्या पदावर रुजू होण्याकरिता दिनांक २५/०२/२०२५ रोजीच्या पत्राद्वारे कार्यमुक्त केले.

३. "अधीक्षक, जिल्हा कारागृह, वर्ग २/उप अधीक्षक, मध्यवर्ती कारागृह, गट ब (राजपत्रित)" या संवर्गातील पदाचे नियुक्ती प्राधिकारी हे शासन हे आहे. त्यामुळे श्री. आढे यांना शासनाच्या मान्यतेने उक्त संवर्गातील पदावर पदोन्नतीने पदस्थापना देण्यात आली होती.

४. श्री. खरात यांनी मा. मुख्यमंत्री यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात आलेल्या शासन आदेशांचे उल्लंघन आणि शासनाच्या अधिकारात हस्तक्षेप केला आहे. ही बाब अत्यंत गंभीर व अक्षम्य स्वरुपाची आहे.

५. शासनाच्या आदेशाचे पालन वा आदर न करणे हे श्री. खरात यांच्यासारख्या एका गट ब (राजपत्रित) दर्जाच्या पदावरील अधिका-यास शोभनीय नाही.

६. तसेच, श्री. खरात यांनी शासनाच्या (मा. मुख्यमंत्री) अधिकारात जाणून-बुजूण हस्तक्षेप करणे ही बाब महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक), नियम १९७९ याच्या नियम ३ चा उल्लंघन करणारी आहे.

७. यामुळे आता महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ मधील नियम ४ च्या पोटनियम १ (एक) अन्वये प्रदान केलेल्या शक्तींचा वापर करून, याद्वारे, श्री. ज्ञानेश्वर हरिभाऊ खरात यांना "अधीक्षक, जिल्हा कारागृह, वर्ग २/उप अधीक्षक, मध्यवर्ती कारागृह, गट ब (राजपत्रित)" या संवर्गाच्या पदावरील शासन सेवेतून या शासन आदेशाच्या दिनांकापासून निलंबित करण्यात येत आहे.

८. त्यानुसार असेही आदेश देण्यात येत आहेत की, निलंबनाच्या कालावधीत श्री.ज्ञानेश्वर हरिभाऊ खरात यांना महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी, सेवेतून काढून टाकलेल्या काळातील वेतन) नियम, १९८१ मधील नियम ६८ (एक) (अ) नुसार निर्वाह भत्ता व त्यावरील अनुज्ञेय महागाई भत्ता देय राहील.

९. शासन आणखी असेही आदेश देत आहे की, जोपर्यंत निलंबनाचे आदेश अस्तित्वात असतील तोपर्यंत श्री. ज्ञानेश्वर हरिभाऊ खरात यांचे मुख्यालय "मध्यवर्ती कारागृह,

अमरावती" हे राहील. त्यांना कारागृह उप महानिरीक्षक, पूर्व विभाग, नागपूर, यांच्या पूर्वपरवानगीशिवाय मुख्यालय सोडता येणार नाही आणि त्यांनी पूर्वपरवानगीशिवाय मुख्यालय सोडल्यास ती त्यांची गैरवर्तणूक ठरेल. तसेच, त्यांना दररोज "मध्यवर्ती कारागृह, अमरावती" येथे स्वाक्षरीसह हजेरी देणे अनिवार्य राहील.

१०. हा शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३१२१७२२४०२७२९ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUGRIV SAMBHAJI DHAPATE

Digitally signed by SUGRIV SAMBHAJI DHAPATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FC102DE27DC1B41E747AC6CBB491C4209459C3CF340720EA98FD1D95B19C9F65, cn=SUGRIV SAMBHAJI DHAPATE
Date: 2025.03.12 17:23:33 +05'30'

**(सुग्रिव धपाटे)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

श्री. ज्ञानेश्वर हरिभाऊ खरात, अधीक्षक, जिल्हा कारागृह, वर्ग २/उप अधीक्षक, मध्यवर्ती कारागृह, गट ब (राजपत्रित) *[अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे, यांच्यामार्फत].*

प्रत :-

१) प्रधान सचिव (अपील व सुरक्षा) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे, यांना सूचित करण्यात येते की, श्री. ज्ञानेश्वर हरिभाऊ खरात यांच्यावर सदर निलंबनाचे आदेश बजावून, दुस-या प्रतीवर त्यांची दिनांकीत स्वाक्षरी घेऊन ती प्रत शासनास सादर करावी.
३) कारागृह उप महानिरीक्षक, मध्य विभाग, छत्रपती संभाजीनगर/पूर्व विभाग, नागपूर.
४) निवड नस्ती, तुरुंग-१.